डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला अंतर्गत कृषि महाविद्यालय, नागपूर या महाविद्यालयाच्या <u>नवीन इमारत बांधकामास मंजूरी देण्याबाबत...</u>

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक:पंदेवि-१३२२/प्र.क्र.१७५/७-अे**
**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक**
**मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक:१५.०३.२०२४**

**संदर्भ** :- १.कुलसचिव, डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ,अकोला यांचे पत्र क्र.साप्रवि/जमीन/कृमइमारत/६०६/१६०८/२०२२. दि.०३.०८.२०२२.
२.सार्वजनिक बांधकाम विभाग यांचे पत्र क्र. बैठक २०२३/प्र.क्र.२१/इमा-१. दि.२६.०४.२०२३.

**<u>प्रस्तावना:</u>**

डॉ. पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला अंतर्गत कृषि महाविद्यालय, नागपूर हे भारतातील पहिल्या पाच महाविद्यालयांपैकी एक असून, महाविद्यालय स्थापनेस ११३ वर्ष पूर्ण झालेली आहेत. महाविद्यालयामध्ये भारतीय कृषि अनुसंधान परिषद, नवी दिल्ली यांच्या निकषाप्रमाणे कृषि विद्यास्नातक, स्नातकोत्तर व कृषि अभ्यासक्रमाच्या अनुषंगाने विविध प्रकारचे विस्तार, तसेच, संशोधन विषयक कामकाज आजतागायत अविरतपणे चालू आहे.

नागपूर कृषि महाविद्यालयामध्ये सर्व साधारणपणे कृषि विज्ञान स्नातक व स्नातकोत्तर एकूण १२०० विद्यार्थ्यांची क्षमता आहे. कृषि महाविद्यालयामार्फत आजतागायत विद्यादानाचे कार्य अविरतपणे चालू आहे. तसेच, विदर्भातील शेतीविषयक समस्यांचे निराकरण करण्याचे कार्य कृषि महाविद्यालयामार्फत सुरू आहे. कृषि महाविद्यालयासाठी असलेली इमारत ही १५० वर्षापेक्षा जास्त जुनी आहे. वसतीगृहे, प्रयोगशाळा, तसेच, विभागातील लहान वर्ग खोल्या आहेत. भारतीय कृषि अनुसंधान परिषदेकडे नुतनीकरणाबाबत वेळोवेळी प्रस्ताव सादर करण्यात आले. परंतु, आवश्यक तसा प्रतिसाद न मिळाल्यामुळे महाविद्यालयाच्या इमारतीची स्थिती दिवसेंदिवस खराब होत आहे.

कृषि महाविद्यालय, नागपूर या महाविद्यालयाची सद्यस्थितीत असलेली मुख्य इमारत ही हेरीटेज इमारत असून सदर इमारत ही फार मोडकळीस आलेली आहे. यामध्ये असलेल्या विद्यार्थ्यांच्या संख्येनुसार सुविधा पुरेशा नसून, सद्यस्थितीत महाविद्यालयाच्या प्रथम वर्षाच्या विद्यार्थ्यांची संख्या १८५ असतांना, वर्ग खोली मात्र चाळीस विद्यार्थ्यांना बसण्याइतकीच आहे. तसेच, सदर इमारत हेरीटेज इमारत असल्यामुळे, या इमारतीचे जतन करणे, नुतनीकरण करणे या बाबींवर मर्यादा आहेत आणि म्हणून विद्यार्थ्यांचे शैक्षणिक कार्य योग्यरित्या पूर्ण होण्याकरिता महाविद्यालयास नवीन इमारत निर्माण करणे आवश्यक आहे. सद्यस्थितीत असलेल्या इमारतीबाबत वेळोवेळी महाविद्यालयाच्या होणाऱ्या मुल्यांकनामध्ये प्रश्न उपस्थित केले जात असून, विदर्भातील ऐतिहासिक

महाविद्यालयाची मान्यता सुरु ठेवण्यासाठी अद्ययावत वर्ग खोल्या, प्रयोगशाळांसह शैक्षणिक इमारत असणे गरजेचे आहे. सद्यस्थितीत असलेली इमारत ही १५० वर्ष जुनी असलेली वास्तु असल्याने या वास्तुचे जतन करणे आवश्यक आहे. परंतु, यामध्ये विद्यार्थ्यांचे शैक्षणिक कार्य चालू ठेवणे धोक्याचे होत चाललेले आहे. कारण, सदर इमारतीस बऱ्याच ठिकाणी मोठमोठया भेगा पडलेल्या आहेत. त्यामुळे कृषि महाविद्यालय, पुणे येथे बांधण्यात आलेल्या नवीन इमारतीच्या धर्तीवर, कृषि महाविद्यालय,नागपूरसाठी नवीन इमारतीचे बांधकाम करणे आवश्यक आहे.

नागपूर येथील कृषि महाविद्यालयातील विद्यार्थ्यांचे शैक्षणिक कार्य चालू ठेवणे आवश्यक असल्याने अद्ययावत वर्ग खोल्या व प्रयोगशाळांसह इमारत आवश्यक असल्याने, नवीन इमारत बांधकामासाठी कृषि परिषदेच्या दि.२४.०७.२०१९ च्या १००व्या बैठकीत ठराव क्र.२०/१००/२०१९ अन्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे.

नागपूर कृषि महाविद्यालयाच्या बांधकामास कार्यकारी अभियंता, नागपूर तसेच, अधीक्षक अभियंता, नागपूर, सार्वजनिक बांधकाम विभाग यांची मान्यता (Vetting) प्राप्त झालेली आहे. नियोजन विभाग शासन परिपत्रक क्र.ससमा २०१०/प्र.क्र.४८(भाग-१)/१४६१ दि.११/०६/२०१८ मधील निदेशानुसार, नागपूर येथील कृषि महाविद्यालयाच्या बांधकामास, मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील उच्चाधिकार समितीची मान्यता प्राप्त झालेली आहे. सदर समितीने एकूण रू.५९.५९ कोटी इतक्या किंमतीस सहमती दर्शविली आहे.

उपरोक्त वस्तुस्थिती पाहता, डॉ. पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला अंतर्गत कृषि महाविद्यालय, नागपूर या महाविद्यालयाच्या नवीन इमारत बांधकामास परवानगी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला अंतर्गत कृषि महाविद्यालय नागपूर येथील नवीन इमारतीच्या बांधकामासाठी आवश्यक रू.५९.५९ कोटी इतक्या रकमेस प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.यासंदर्भात सार्वजनिक बांधकाम विभागाने मंजूर केलेल्या बाबींनुसार **(परिशिष्ट अ)** मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर मान्यता खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

१) काम सुरु करण्यापूर्वी नमुना नकाशा, मांडणी नकाशा, तसेच, विस्तृत नकाशास वास्तुविशारदांकडून मंजूरी घेऊनच काम सुरु करावे.

२) ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक करुनच काम हाती घ्यावे.

३) सदर कामाच्या बांधकामाचा खर्च विद्यापीठाने त्यांच्याकडे उपलब्ध असलेल्या नियतव्ययामधून भागवावा.

४) नियोजित जागा उपभोक्ता विभागाच्या ताब्यात असल्याचे प्रमाणपत्र प्राप्त करुन सदर कामाच्या निविदा सूचना प्रसिध्द करण्यात याव्यात.

५) सार्वजनिक बांधकाम विभाग शासन निर्णय क्र.बीडीजी २०१७/प्र.क्र.६०/इमारती-२,दि.०७/०७/२०१७ अन्वये कार्यवाही करण्यांत यावी.

६) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र. इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/ तां.क.१, दि.१० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्त्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

७) प्रस्तावित करण्यात आलेल्या इमारतीचे जोते क्षेत्रफळ कर्मचारीवर्ग यांच्या अनुज्ञेय मानकाप्रमाणे असल्याची खातरजमा करण्यात यावी.

३. या बाबीकरीता येणारा खर्च " मागणी क्रमांक डी-३, २४१५ कृषि विषयक संशोधन व शिक्षण, ०१, पीक संवर्धन, १२०, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजनांतर्गत योजना, (००) (०८) डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठाला सहायक अनुदान, ३५, भांडवली मत्तेच्या निर्मितीकरीता अनुदान (२४१५ ००९९)" या लेखाशीर्षाखाली अर्थसंकल्पीत केलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

४. या प्रकरणी महाराष्ट्र कृषि विद्यापीठे अधिनियम, १९८३, परिनियम, १९९० आणि लेखासंहिता, १९९१ मधील तरतूदींचा, तसेच, प्रचलित शासन आदेश / कार्यपध्दतीचा अवलंब करण्यात यावा.

५. हा शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्रमांक ६४/२०२३ /इमा - २, दिनांक २८.०३.२०२३ व मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील सचिव समितीच्या दि.२१.०४.२०२३ रोजी पार पडलेल्या बैठकीत प्रदान केलेल्या मान्यतेनुसार, तसेच, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग- पहिला, उपविभाग - पाच अन्वये महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिका अंतर्गत परिच्छेदांखालील प्रदान करण्यात आलेले वित्तीय अधिकार या शिर्षाखाली अ. क्र.१, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्र.१३४ समोरील तरतूदीन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या शक्तींनुसार त्या समोरील विहित अटीच्या अधीन राहून, तसेच, नियोजन विभाग, शासन परिपत्रक क्रमांक : ससमा-२०१०/प्र.क्र.४८ (भाग-१)/ का. १४६१, दिनांक ११ जून, २०१८ मधील तरतुदीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२४०३१५२३२०३८९२०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRATIBHA MADHAV PATIL

Digitally signed by PRATIBHA MADHAV PATIL
DN: CN = PRATIBHA MADHAV PATIL, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = URBAN DEVELOPMENT DEPARTMENT
Date: 2024.03.15 23:31:00 +05'30'

**( प्रतिभा पाटील )**
**उप सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा/विधानपरिषद), महाराष्ट्र राज्य.
३. सदस्य सचिव तथा महासंचालक, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे.
४. कुलगुरू,डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला.

५. कुलसचिव, डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला.
६. मा.मुख्य सचिव, यांचे सहसचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
७. वित्त सल्लागार, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे.
८. नियंत्रक, डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला.
९. विद्यापीठ अभियंता, डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला.
१०.महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखापरीक्षा) मुंबई / नागपूर.
११.महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर.
१२. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर/ अकोला.
१३.उपकोषागार अधिकारी, नागपूर/ अकोला.
१४. मुख्य लेखा परीक्षक,स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
१५. उप लेखा परीक्षक (वरिष्ठ), स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
१६.लेखा अधिकारी, डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला.
१७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१९.कार्यासन (१४३१), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
२०. कार्यासन (व्यय-१), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
२१.कार्यासन (इमारती-२), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
२२.कक्ष अधिकारी २अे/६अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
२३. कार्यासन ७अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२ (निवडनस्ती).

"परिशिष्ट -अ"

**Name of the Department : कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग.**

**Name of Work : Construction of New Campus for College of Agriculture Nagpur under Dr. Punjabrao Deshmukh Krishi Vidyapeeth, Akola.**

**RECAPITULATION SHEET**

| Sr. No. | Particulars of Scope | | Unit Rate Norms Rs Per (Sqmt./Meter/LumpSum etc.) | | Cost Rs. Component Wise | Cost Rs. Total |
|---|---|---|---|---|---|---|
| **(A)** | **ESSENTIAL ITEMS (Components)** | | | | | |
| 1 | **(a) Building proper (Built Up Area - Sq.m)** | | | | | |
| **College Building** | | | | | | |
| | Ground Floor | 4061.01 | Sq.M. | 28,000 | 113,708,280 | |
| | First Floor | 3687.53 | Sq.M. | 28,000 | 103,250,840 | |
| | Second Floor | 3674.29 | Sq.M. | 28,000 | 102,880,120 | |
| | **Total B.U.A. =** | **11422.83** | Sq.M. | | **Sub Total (a)** | **319,839,240** |
| | **(b)** Solar Roof Top | | | | 2,500,000 | |
| | **(c)** Furniture 11422.83 x 70%= 7996 | 7996 | Sq.M. | 5,000 | 39,980,000 | |
| | | | | **Sub Total (b+c)** | | **42,480,000** |
| 2 | Water Supply & Sanitary Works | | 5% of (a) | | **Sub Total (2)** | **15,991,962** |
| 3 | Electrification | Internal | | 5% of (a) | 15,991,962 | |
| | | External | | 6% of (a) | 19,190,354 | |
| | Fire Fighting Arrangements etc. | | | | 10,000,000 | |
| | | | | | **Sub Total (3)** | **45,182,316** |
| | | | | **Sub Total (A)** | | **423,493,518.40** |
| **(B)** | **MISCELLANEOUS ITEMS** | | | | | |
| | (i) Compound Wall & Gate (Rmt) | 2000.00 | Rmt | 8000 | 16,000,000 | |
| | (ii) Internal Road | | | LS | 15,000,000 | |
| | (iii) Development of Ground | | | LS | 2,500,000 | |
| | | | | | **Sub Total (B)** | **33,500,000** |
| | | | | **Sub Total (A) = (1)+(2)+(3)+(B)** | | **456,993,518** |
| **(C)** | **OPTIONAL ITEMS** | | | | | |
| 1 | AB Room, Area lighting, Pump Generator, | | | | 3,000,000 | |
| 2 | CCTV | | | | 1,500,000 | |
| 3 | Airconditioning | | | | 5,000,000 | |
| | | | | **Sub Total (C)** | | **9,500,000** |
| | | | | | **Project Cost (P)= (A) + (B) + (C)** | **466,493,518** |
| **(D)** | **PROVISIONS** | | | | | |
| | | | | **(i) Contingencies 4% on (a)** | **12,793,570** | |
| | | | | **(ii) GST 18% on (P)** | **83,968,833** | |
| | | | | **(iii) Price Escalation 5% on (P)** | **23,324,676** | |
| | | | | **(iv) Labour Insurance 0.5% on (P)** | **2,332,468** | |
| | | | | **(v) PMC 1.5% on (P)** | **6,997,403** | |
| | | | | **Sub Total (D)** | | **129,416,949** |
| | | | **TOTAL COST OF PROJECT (TPC)** | | **(A+B+C+D)** | **595,910,468** |
| | | | | **Say Rs. Lakhs** | **5959.10** | |

**PLINTH AREA RATES FOR**

(i) Bldg Proper Cost `= Rs 28,000 /Sqm

(ii) Elect. Work `= Rs 3,955 /Sqm

(iii) Water Supply `= Rs 1,400 /Sqm

(iv) For (i) + (ii) + (iii) `= Rs **33,355** /Sqm

PRATIBHA MADHAV PATIL

Digitally signed by PRATIBHA MADHAV PATIL
DN: CN = PRATIBHA MADHAV PATIL, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = URBAN DEVELOPMENT DEPARTMENT
Date: 2024.03.15 23:31:48 +05'30'

( प्रतिभा पाटील )

उप सचिव, महाराष्ट्र शासन